| | |
|---|---|
| Convertion in Regular Temporary Establishment:- Shri.Baliram Bhika Maraskole working under S.E. & Administrator, CADA, Nagpur | कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण-- **श्री. बळीराम भिका मरसकोल्हे , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर** |

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. रुअआ-२०११/ (६२/२०१०)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-१०/१०/२०११

**पहावे** :- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.४.२००१
२) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांचे पत्र जा. क्र. ३३९६/लाविप्रा/आली.१/२०१०, दिनाक ०१/६/२०१०.

**प्रस्तावना:**

अधिक्षक अभियंता व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर यांच्या नियंत्रणाखालील विभागीय कार्यालयात श्री. बळीराम भिका मरसकोल्हे हे दि १.९.८४ पासून रोजंदारी आस्थापनेवर अकुशल हलका मजूर म्हणून कार्यरत असून दि.१.१.१९८७ पासून त्यांची रोजंदारीवर सलग सेवा आहे व दि.२८.८.१९८७ रोजी त्यांचे सलग सेवेचे २४० दिवस पूर्ण झालेले आहेत. तथापि, यापूर्वी सादर केलेल्या रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतच्या एकत्रीत प्रस्तावातून श्री.मरसकोल्हे यांचे नांव अनवधानाने सुटल्याने अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर कार्यालयाने त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक १.६.२०१० च्या पत्रान्वये सादर केला आहे.

श्री.मरसकोल्हे यांचा प्रथम नियुक्तीचा दिनांक १.१.१९८४ असलातरी दि.१.१.८७ ते २८.८.८७ या कालावधीत त्यांची सलग २४० दिवस सेवा झाली असल्यामुळे दि.१.१.१९८७ हा त्यांचा नियुक्तीचा दिनांक विचारात घेवून शासन निर्णय दि.२४.४.२००१ मधील तरतूदीनुसार श्री.मरसकोल्हे यांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांतर्गत कार्यरत असलेल्या श्री. बळीराम भिका मरसकोल्हे यांना अकुशल हलका मजूर पदी अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यास खालीलप्रमाणे शासन मंजूरी देत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. बळीराम भिका मरसकोल्हे | रोजंदारी | अकुशल हलका मजूर १.१.८७ | १.१.१९९२ | अकुशल हलका मजुर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

२. श्री. बळीराम भिका मरसकोल्हे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४.	श्री. बळीराम भिका मरसकोल्हे यांना दि.१.१.१९९२ पासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्यानंतर अनुज्ञेय होणा-या वेतन फरकाच्या थकबाकीच्या रक्कमपैकी दि.३१.८.२००० पर्यतची थकबाकीची रक्कम (सर्व भत्यासहीत) कमाल दहा समान वार्षीक हप्त्यात सन २०१२-१३ या आर्थिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यात संबंधित कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा करावी व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा झाल्यापासून तीन वर्षापर्यत सदर रक्कम त्यांना खात्यातून काढता येणार नाही. मात्र, दि. ३१.८.२००० पासूनची अनुज्ञेय असलेली वेतन फरकाची १०० टक्के रक्कम संबंधित कर्मचा-यांस धनादेशाद्वारे (Cheque ) अदा करावी.

५.	श्री. बळीराम भिका मरसकोल्हे यांची वेतन निश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांका पासून करण्यात यावी. सदर प्रस्तावावरील वेतनापोटी होणारा खर्च सन २०११-१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६.	परिच्छेद ४ मध्ये नमुद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही तसेच संबंधित कर्मचा-यांकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यात येणार नाही अशाप्रकारचे प्रतिज्ञापत्र लिहुन घेणे बंधनकारक राहील.

७.	हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

८.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक २०११११०१०१७०६४५००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबतः प्रपत्र ब

**( अ.अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र - २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
अधिक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, भंडारा
कार्यकारी अभियंता, गोंदिया पाटबंधारे विभाग, गोंदिया
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.